**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता महत्वाचे रस्ता/रेल्वे / कालवे दुतर्फा वृक्ष लागवड (४४०६ ०४९२) लेखाशीर्षांतर्गत निधी वितरण करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सावनि-२०१८/प्र.क्र. ७८ /फ-११

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०६.११.२०१८

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक अंदाज-२०१५/ प्र.क्र.३६/ फ-११, दि.१६ जून २०१५

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.

३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. सावनि-२०१८/ प्र.क्र. ७८/ फ-११, दि. ०२.०७.२०१८

४) अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) , महाराष्ट्र राज्य , नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष -१/यो/ नबाप्र/प्र.क्र.१९/२०१८-१९/१३३८, दि. ३१.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरिता राज्य योजनेंतर्गत सन २०१८-१९ करीता **"सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम ( ४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत रु. ६७०००.०० लक्ष इतका निधी** (०२- मजूरी रु. ५७०६९.२० लक्ष + २१ पुरवठा वसामुग्री रु. ९९३०.८० लक्ष) अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. त्यापैकी महत्वाचे रस्ता/रेल्वे / कालवे दुतर्फा वृक्ष लागवड करणेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात माहे एप्रिल-२०१८ ते डिसेंबर २०१८ पर्यंतच्या ९ महिन्यांच्या कालावधीकरिता वित्त विभागाच्या संदर्भिय दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकास अनुसरुन अर्थसंकल्पित रकमेच्या ७० % म्हणजेच रु.२५३७८.५० लक्ष इतका निधी वितरित करता येऊ शकेल.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी मागणी केलेल्या एकूण रु.२५०६९.०८ लक्ष इतक्या रकमेपैकी संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये रु. ६२६७.२७ लक्ष इतका निधी (२५%) वितरित करण्यात आला आहे.

४. (००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण (४४०६०४९२) या योजनेंतर्गत महत्वाचे रस्ते/ कालवे/रेल्वे लाइनच्या दुतर्फा वृक्ष लागवड करणेसाठी मागणी केलेल्या एकूण रु. २५०६९.०८ लक्ष या रकमेपैकी आणखी २५ % म्हणजेच रु. ६२६७.२७ लक्ष निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

वन व वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरिता सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या "महत्वाचे रस्ते/ कालवे/रेल्वे लाइनच्या दुतर्फा वृक्ष लागवड करणे (४४०६ ०४९२) " हया योजनेकरिता संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये मागणी केलेल्या रकमेपैकी **रु.६२६७.२७ लक्ष निधी (०२ मजूरी- रु.५३२७.१८ लक्ष + २१ सामग्री पुरवठा- रु. ९४०.०९ लक्ष) वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता

घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. **सदर निधी खर्च करण्यापूर्वी ज्या प्रकरणी वन परिक्षेत्र अधिकारी/ सहायक वन संरक्षक यांनी त्यांना प्रदान करण्यात आलेलया अधिकाराबाहेर तांत्रिक प्रशासकीय मान्यता दिली आहे अशा प्रकरणी सक्षम अधिकाऱ्यांनी सुधारित तांत्रिक/ प्रशासकीय मान्यता प्रदान करावी.**

४. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनाक ०२.०४.२०१८ परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-१०**
**४४०६, वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण अंतर्गत**
**महत्वाचे रस्ते/कालवे/रेल्वे लाईनच्या दुतर्फा वृक्ष लागवड (४४०६ ०४९२)**
**०२- मजूरी, २१- सामुग्री पुरवठा**

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११०६१३५२१९०७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.11.06 14:00:20 +05'30'

**( वीरेन्द्र तिवारी )**
**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )

५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )

६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )

७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,

८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.

१०.निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई

११.वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२

१२.कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१३.कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४.उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५. निवडनस्ती/फ-११.